१५.०६.२००९
अंक : ३१

# नेटाक्षरी

ई-साहित्य प्रकाशन



काव्यांजली आणि मराठी कवितातर्फे दर महिन्याच्या पहिल्या पंधरवड्यात घेण्यात येतेय ‘नवरसरंग महाकविता स्पर्धा’.ह्या अंतर्गत १ मे-१५ मे ०९ ह्या कालावधीत हास्यरसावरील स्वरचित कविता मागविण्यात आल्या होत्या.जगभरातून ह्या स्पर्धेतील प्रत्येक काव्यरसासाठी उदंड प्रतिसाद लाभतोय व मागील महिन्यातील हास्यरसावर आधारित विजेत्या कवितांनी खळखळतोय

नेटाक्षरीचा हा अंक.

ह्या स्पर्धेचे परिक्षक होते..

**हास्यसम्राट मालिकेचे परिक्षक व सुप्रसिध्द कवी श्री.अशोक नायगावकर.**

निकालासाठी केवळ ३ कविता निवडणं त्यांना अन्यायकारक वाटलं म्हणून त्यांनी एकूण कवितांचे २ भाग केलेत,हास्यकविता आणि विडंबन.



## ह्या अंकात वाचा..

- हास्यरसिल्या कविता
- हास्याच्या नायगाराकाराची लेखणी

**संपादक –**

स्वप्ना कोल्हे ( नाशिक )

सोनाली घाटपांडे ( पुणे )

रेणुका रेपाळ ( अमेरिका )

सुरुचि नाईक ( नागपूर )

आनंद माने ( सोलापूर )

अहं ब्रह्मास्मि ( पुणे )

सचिन काकडे ( मुंबई )

सारंग भणगे ( पुणे )

नाम गुम जायेगा ( ठाणे )

**विशेष अतिथी –**

अशोक नायगावकर ( मुंबई )

हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी तसेच सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी..
netaksharee@gmail.com

# हास्य कविता

## प्रथम क्रमांकाची कविता

**..लग्नाच्या गाठी..**

जन्मोजन्मीचं  वैर काढत
तो दिवसरात्र तिच्याशी भांडत असतो
कोण म्हणतो लग्नाच्या गाठी
देव स्वर्गात बांधत असतो ?

लग्नापूर्वीचे गुलाबी दिवस
लग्नानंतर रहात नाहीत
एकदा लग्न लाऊन दिलं की
देवसुद्धा खाली पहात नाहीत

मग लग्नापूर्वीचा तो हुशार नवरा
तिला भलताच चक्रम वाटायला लागतो
आणि हळुहळु तिच्या चेहऱ्यावरचा
प्रेमळ मुखवटा फाटायला लागतो

आपला नवरा बैल आहे
असं प्रत्येक बाईला वाटत असतं
त्याच्या तऱ्हेवाईक वागण्याचं दु:ख
तिच्या मनात दाटत असतं

तो कधी कसा वागेल
ह्याची जरासुद्धा खात्री नसते
नको तेच नेमकं बोलून जाईल
जे बोलायचं त्याला कात्री असते

मग जमेल तिथं, जमेल तेंव्हा, जमेल तितकं
ती त्याला बोलत बसते
त्याच्या तेही डोक्यावरून जातं
पण ह्या नंदीबैलाची मान डोलत असते

त्याचा तो गबाळा अवतार
तिला निटनेटकं रहायचं असतं
तिला चार दिवस सासूचे
त्याला स्पोर्टस चॅनल पहायचं असतं

लहान मोठ्या चाकाचा हा संसाराचा रथ
पळत कसला, रांगत असतो
कोण म्हणतो लग्नाच्या गाठी
देव स्वर्गात बांधत असतो ?




ती तरी थोडी त्याच्यासारखी असेल
असं प्रत्यक्षात घडत नाही
त्याच्या स्वप्नाचे पंख लाऊन
ती त्याच्या आकाशात उडत नाही

तो गच्चीत तिला घेऊन जातो
इंद्रधनुष्यावर चालायला
ती सोबत पापड कुरडया घेते
गच्चीत वाळत घालायला

त्याच्या डोळ्यात क्षितिजावरची
लखलखती शुक्राची चांदणी असते
हिच्या डोक्यात गोडा मसाला
आणि वर्षभराची भाजणी असते

प्रेमात रंगून, नशेत झिंगून
खूपसं जवळ, काहीसं लांबून
थोडीशी घाई, थोडसं थांबून
पौर्णिमेचा चंद्र त्याला
तिच्या केसात माळायचा असतो
आणि त्याच वेळेस तिला मोरी धुवायची
किंवा संडास घासायचा असतो

आपली बायको म्हैस आहे
असं हा रेडा सगळ्यांना सांगत बसतो
कोण म्हणतो लग्नाच्या गाठी
देव स्वर्गात बांधत असतो ?

**- धुंद रवी**

# द्वितीय क्रमांकाची कविता

## Corporate ओव्या

थोडेसे भाषेविषयी –

ही भाषा आपल्या मायबोलीसारखी भासली तरी ही
मायबोली नसून MY-बोली आहे
बाज मऱ्हाटीचा असला तरी साज English आहे

ह्या भाषेतील एक आदि काव्य

“ जैसी ड्रिंक्स माजी Antiquity
फास्टफूडा माजी स्पेगिटी
languages माजी गोमटी
MY-बोली ”

तर अशा ह्या MY-बोली मधील काही ओव्या आहेत

इथे पुढ्यात फिरते जाते नसले तरी कंप्युटरवर फिरणारी
एखाद्या प्रोजेक्टची CD नक्की असेल
थोडक्यात काय, व्यथा त्याच आहेत फक्त जरा TechnoSavvy झाल्या आहेत

नाही दळण कांडण
नाही दाणा ना कणीस
Corporatee भरडतो
एकमेकाले माणूस

मंदी मधि बिगडला
जमाखर्चाचा Ratio
खिशामाजी मोबाईल
कॉल कराया  PCO

आला मार्च गेला मार्च
संगे आले रिसेशन
नाही मिळाला बोनस
अन नाही प्रमोशन

चालुगिरी चाटुगिरी
विश्वासघात दम
corporatee म्हणतात
ह्याले Professionalism

तत्व निष्ठां morality
ह्याचे सजले टेबल
सेल लागला लागला
Price Negotiable

माह्या बा बॉसाची PRO
कशी दिसे Tiptop
कधी होई desktop
कधी होई laptop

माह्या बा बॉसचे बॉसाले
जो जो लावितो custurd
त्याले मिलते रेटिंग
I'll kill that basXXXX

अजुनही खूप काही
होते मल्हे लिहायचे
शब्द सॅन्सॉर्ड जाहाले
आता ओठ शिवायाचे

- **समीर सामंत ( मुंबई )**



# तृतीय क्रमांकाच्या कविता ( विभागून )

**..पाढा-- बे एकं बे..**




बे एकं बे
बे दुणे चार
टेनिसचा बॉल
कुठे गेला यार ?

तिथं होती बॅट
कुठे झाली गुडूप
आई ती उठली
उचललं सूप

सुपातले गहू
“सास की बहु?”
पाखडता गव्हाला
शिंकला तो बाळ्या

बाळ्याच्या हातात
भोवऱ्याची दोरी
सुटलेला भोवरा
भिरभिर करी

ओरडला रव्या
खिदळली ठमी
बाजूच्या बाकावर
चाललीय रमी

राजा की राणी,
किल्वर का बदाम,
बुढी काय भजते
“रावण की राम?”

हातातली काठी
वाकडी कंबर
चष्म्यातले डोळे
बघे खाली-वर

वाजली ती घंटी
कोण आला दारी?
ब्रेडवाला मामू
“टोस्ट की खारी?”

शेजारची काकू
बोलावते त्याला
काकुची चिंगी
चिडवते मला

“चिंगी रे चिंगी
वाजव तुझी पुंगी”
रडू आले तिला
च्यायची ढोंगी

पाठीत धपाटा
“बे त्रिक आई sss!”
“अभ्यास कर पिंट्या
नाही तर खरं नाही!” ...

बे चौक आठ
दुखत होती पाठ
बे पंचे दहा
बे सक बारा.....
...
..
बे दाहे वीस
चिंगी होती खवीस
.

**- भूषण महाजन उर्फ भूराम ( अमेरिका )**

## ..आजीच्या तेराव्याचं गेट टुगेदर..

सकाळ पासून उगाचच गर्दी केली होती
तसं विधीप्रमाणेतर ही कर्मं..
दुपारी बारा नंतरच करायची असतात,
पण ब्राह्मणांच्या दुसरीकडे बुकिंग्ज असल्यामुळे..
आजकाल चालतं म्हणे।
आज आजीच्या तेराव्या दिवसाचे विधी होते
म्हणून घाटाजवळचं कार्यस्थळ घेतलं होतं
हो! आजकाल त्याचीही सोय झालीय
घरी जागा कमी पडते आणि शिवाय
कार्यस्थळ लांब असलंच तर
लोकांच्या येण्याची शक्यताही.. दोन्ही फायदे ..,
आणि तसंच झालंही... सत्तर मोजून चललो होतो, पन्नासच आले,
पंचेचाळीस लोकांचेच पान सांगितले बरं झालं..
आमच्या बरोबर एक अजून कुणीतरी तिथे आले होते,
त्यांच्याकडे वर्षश्राद्ध असावं असा आम्ही..
त्यांच्यासोबत आलेल्या दहा-पंधरा माणसांवरून अंदाज लावला..
हॉल शांतिपूर्वक दोन हिश्शांमधे वाटला गेला होता
एकीकडे आमची आजी, दुसरीकडे त्यांची,
बाकी हॉलमधे शांतता;
तिघी शांता काकूंच्या हॉलमधील उपस्थितीतही..
फक्त आणि फक्त त्या दोघी आज्यांच्याच चेहऱ्यांवर दिसत होती..
दोघांमध्ये कॉमन गुरुजी
ती दुसरीच पंचायत;
कारण ते सांगत कोणाला होते
आणी ऐकत कोण..!
गोंधळच गोंधळ..
मुलांनी वेगळीच धमाल केलेली होती
कुठल्या कारणासाठी आलोय, ह्याचे जराही भान न ठेवता..
आया आपापली अपत्ये वाऱ्यावर सोडून गॉसिप्समध्ये रंगल्या होत्या..
त्यातच ती पिढ्यांचा फरकही अगदी स्पष्टपणे जाणवत होता
तो हॉल कुणा सौंच्या स्मृतीत बांधलेला होता..
त्या सौं दुसऱ्या पिढीच्या असाव्यात ते त्यांच्या साडीतल्या फोटोवरुन कळत होते..
कारण खाली ठेवलेले दोन्ही आज्यांचे फोटो मात्र नऊवारीतलेच होते;
अजुन तिसऱ्या पिढीचा फोटो नव्हता लागला. पण तो सलवार-सूटस मध्येच असेल
ह्याची शक्यता आम्ही आजु-बाजुस पाहून शंभर टक्के राहिल, असं मनात म्हंटलं..
एकाचंही लक्ष नव्हतं काय चाललंय त्यात!
हो नमस्काराच्या वेळेस,तेवढं लक्षात आलं कशासाठी आलोय,
म्हणून काहींचे डोळे पाणावले जरुर..,आणि त्याच गडबडीत पाला सुद्धा चेंज झाला
इकडचे तिकडे पोहोचले आणि तिकडचे एक-दोन इकडे सामिल झाले
पण कुठेही असो..देवा! त्या दोघी आज्यांच्या आत्म्याला शांती लाभू दे!
एवढं औपचारिक बोलून नमस्कार केला,आणि गेट-टुगेदर संपवून मी घरी परतलो..






**- चेतन फडणीस,मध्य प्रदेश**

# विडंबन कविता

## प्रथम क्रमांकाची कविता

**..रस्त्यात धुमसत पडलेले विडीचे थोटूक..**

***( "मन माझे मोहूनी गेले, कितीतरी"चे विडंबन)***




पथ सर्व सुगंधीत झाले
मन माझे मोहूनी गेले कितीतरी
मी सारे पथ हुडकीले
थोटूक कुठे ना दिसले मजतरी .

गावात कारखान्यास, विड्याच्या आज
लागली आग
असे कल्पिले, असे कल्पिले
मन माझे मोहूनी गेले, कितीतरी.

मग फिरता फिरता दिसले
थोटूक विडीचे नामी पदपथी.
मी प्रेमे वदलो त्यासी,
का येथे पडूनी असशी, थोटका ?

तू गडे विड्यांची राणी
तुला गे कोणी टाकीले मार्गी
मार्गी टाकीले ?
मन माझे मोहूनी गेले, कितीतरी.

रागाने धुमसत धुमसत,
थोटूक विडीचे वदले ,
यापरी –
"तो पहा पाचवा मजला
तेथूनी टाकिले मजला, पदपथी .

निज जीव रिझवण्यासाठी
पकडीले तयाने ओठी,
अंगार लावूनी पाठी,
मला फुंकीले, मला फुंकीले
मन माझे मोहूनी गेले कितीतरी.

तम्बाकू हृदयामधली,
शेवटी जेधवा सरली
चुरगळूनी पायाखाली
मला विझविले, मला विझविले
मन माझे मोहूनी गेले कितीतरी.

ऐकूनी विडीचे बोल
मम हृदयी पडले होल लहानसे
कुणी पाहत नाही बघुनी
उचलुनी घातले वदनी
मग दीर्घ श्वास घेऊनी
तिला झुरकिले , तिला झुरकिले
मन माझे मोहूनी गेले कितीतरी.

\- **सुनील सुळे**

# द्वितीय क्रमांकाच्या कविता ( विभागून )

## ..मिस्सळ मी चापतो ,तर्रीची , मिस्सळ मी चापतो..

## ( "राधा ही बावरी"चे विडंबन )

मिस्सळ मी चापतो, तर्रीची ,मिस्सळ मी चापतो
मस्तीत दंग, तो लाल रंग, हा गंध कसा दरवळतो
ह्या चालत जाता वाटेवरूनी, स्वर्गच हाती येई
मिस्सळ मी चापतो, तर्रीची ,मिस्सळ मी चापतो

उसळ, मिसळ अन फरसाणा ......... लिंबू पिळून घेताना
घास तिखट तो खाताना ......... घामल धारा झरताना
हा झणझणणारा स्वाद सदाचा , जीभेस बिलगून राही
हा उनाड कांदा गुज चवीचे कानी सागूंन जाई
ह्या चालत जाता वाटेवरूनी, स्वर्गच हाती येई
मिस्सळ मी चापतो, तर्रीची ,मिस्सळ मी चापतो

आज इथे या मिसळस्थळी ......... क्षण भाग्याचे दुणावती
नाक सारखे पुसताना , आनंदे डोळे भरती
हे सत्य असे की स्वप्न म्हणावे , भान हरपूनी जाई
मिसळीवाचून जीवनास या अर्थच काही नाही
ह्या चालत जाता वाटेवरूनी, स्वर्गच हाती येई
मिस्सळ मी चापतो, तर्रीची ,मिस्सळ मी चापतो

**- अविनाश ओगले ( बेळगाव )**




## ..सखे काढ गळ्यातले..

## ( "सखे काढ गळ्यातले"चे विडंबन )

सखे काढ गळ्यातले
तुझे चांदण्यांचे हात
झाडमागे दूरवर
मला दिसे तुझा बाप

बळ शौर्य एकाएकी
वाटे गेले दूरवर
गळ्यातील आवंढाही
होऊ लागे खालीवर

दिसू लागे मलाही
माझे भविष्य साजिरे
पाहूनिया श्वशूराला
माझी काया थरथरे

माझी नाजूक मान अन
त्याचा जाडाभरडा हात
वळावूनी देती मला
एक पेकाटयात लाथ

कानशिल वाजवूनी
माझी धरतील मुंडी
भर उन्हाळ्यात मला
वाजू लागलीये थंडी

सखे हो ग तू बाजूला
तुझा बाप येण्याआधी
झाडाखाली या अन्यथा
होई माझी ग समाधी

**- शंतनू चंद्रात्रे ( बंगलोर )**

# तृतीय क्रमांकाची कविता

**..लोकलची कविता..**

**("काठोकाठ भरू द्या पेला"चे विडंबन )**

काठोकाठ भरू द्या डब्बा गर्दी भराभर उसळू द्या
स्टेशन येता रंग डब्यातील क्षणोक्षणी ते बदलू द्या



कोणी डब्यावर नोटीस लिहिली फक्त महिलांसाठीची
म्हणोत कोणी आम्हास मवाली पर्वा कसली मग त्याची
होऊनीया मग दंग मनी व्हावे ते आणा ध्यानी
गा मग सुचतील ती गाणी
परसुनी त्यांचे शब्द मुलीतील चारचौघीजणी खवळू द्या

काठोकाठ भरू द्या डब्बा गर्दी भराभर उसळू द्या
स्टेशन येता रंग डब्यातील क्षणोक्षणी ते बदलू द्या

दंतपंक्तींची तड्फ आमुच्या तोंडी ज्याने दिली असे
विचकुन दावू लागताच मग धक्का कोणासही कसे
पान खाऊनी थुंकू येता जाताना जिकडे तिकडे
चिकटवूनी ठेवू गम चावून त्याचसाठी हे बाक गडे
उठा उठा चिकटे सलवार
मारा घेऊन या तलवार
शिव्या देऊन कराच वार
छंदफंद उच्छृंखल अमुचे स्तिस्मीत जगाला ढवळू द्या




काठोकाठ भरू द्या डब्बा गर्दी भराभर उसळू द्या
स्टेशन येता रंग डब्यातील क्षणोक्षणी ते बदलू द्या

सोमाचा रस वेदकाळच्या ऋषीवर्यांनी उकळीला
घेऊन पव्वा निघू प्रवासा मीठ मिरचीही चखण्याला
रेल्वेवरच्या तिकीट कलेक्टर, जा निघ या बेकारीने
अम्हा घेरीले म्हणूनी घेतो झिंगूनिया या पानाने
अडवतील पोलीस जरी
झगडू त्यांच्याशी निकरी
हार न खाऊ रतीभरी
देव दानवा नरे निर्मीले हे मत लोकां कवळू द्या

काठोकाठ भरू द्या डब्बा गर्दी भराभर उसळू द्या
स्टेशन येता रंग डब्यातील क्षणोक्षणी ते बदलू द्या

**- नाम गुम जायेगा ( ठाणे )**

# नायगावकरांच्या लेखणीतून..



मराठी कवितांच्या नवरसरंगातील ''हास्य कविता'' स्पर्धेतील सुमारे शंभर कवितांचा हा संग्रह .यामध्ये काही किंचीत कविता आहेत, विडंबने आहेत, तसेच स्वतंत्र आशयाच्या ही कविता आहेत, कवितेवरच्या कविंवरच्याही कविता आहेत . ''पोस्टमार्टेम'' या कवितेत नवकविता व नवकवी यांचीही खिल्ली उडवली आहे . मात्र सदरहू स्पर्धेतील कविता वाचताना बहुतांशी कविता या वाचाव्याशा वाटल्या . अर्थात स्पर्धा म्हटल्यावर – परिक्षा म्हटल्यावर त्यात नापास आले, काठावर पास झालेले, ''बी'' ग्रेडचे, ''बी +''आणि सत्तर टक्यांच्यापुढ़चे असे सर्वच असणार .

काही कवितेमधून नवरा-बायको हा गुळगुळीत झालेला विषय येतो पण तो प्राधान्याने अतिशयोक्तीच्या वळणाने जाणारा असल्याने त्यातून आनंद मिळत नाही. निर्मितीच्या मागे कविता या वाङःमय प्रकाराच्या रूपाचे भान, जीवनानुभव, वाचन, मनन आणि लक्ष वेधून घेणारे वेगळेपण असेल तर रसिकाला ती पुन्हा पुन्हा वाचाविशी वाटते. अशा विनोदाला जर कारूण्याची जोड असेल तर तो विनोद अधिक सकस वाटतो . शाब्दिक कोट्या आपल्याला थक्क करतात पण त्यांचे वजन फार काळ टिकून रहात नाही .



''लग्नाच्या गाठी'' सारख्या ''धुंद रवी'' यांच्या कवितेत

'त्याच्या डोळ्यात क्षितीजावरची लखलखती शुक्राची चांदणी असते
हिच्या डोक्यात गोडा मसाला आणि वर्षाची भाजणी असते'

यातील मनस्वी , कलंदर वृत्ती एकीकडे आणि रांधा वाढा वृत्ती दुसरीकडे हे नेमक्या शब्दातून जाणवते . 'चांदणी'साठी पुढ़च्या ओळीत येणारी 'भाजणी' हे यमक ओढून ताणून आणलेले वाटत नाही . ते विलक्षण सहजतेने येते .

'काढ़ सखे गळ्यातले तुझे चांदण्याचे हात
झाडामागे दूरवर दिसे तुझा बाप'

या विडंबनातून जी दोन टोकं साधली आहेत, ते हास्य साधणे हा फार दुर्मिळ योगायोग असतो .

कुठलीही निर्मीती मग ते विडंबन का असेना, ती ज्या क्षणाला सुचते याचं समाधानकारक तर्काच्या पातळीवरचे उत्तर सापडत नाही .
जे काही सुचणे आहे, थक्क वाटणारे आहे, तिथे तिथे प्रतिभा आहे . हास्य विनोदाची हेटाळणी केली जाते खरी पण मला तर असे हास्यविनोदाच्या अंगाने काही सुचणे हे अत्यंत कठीण वाटत आले आहे .गडाबडा लोळायला लावण्यापासून मंदस्मितापर्यंत अशी हास्यामध्ये विविधता आहे .

नवरसरंग या एकूण स्पर्धेतील मला आवडलेल्या कविता म्हणजे ''परिट, दुधवाला, डॉक्टर, वाणी यांच्या प्रेमभंगाचे छोटे छोटे तुकडे'', ''नाही बरे'' हा हजल, सारं कसं तेच तेच,पाढ़ा बे एके बे,कॉर्पोरेट ओव्या,आजीच्या तेराव्याचे गेट टू गेदर,लग्नाच्या गाठी या कविता स्वतंत्र अनुभवाच्या म्हणून आवडल्या .

आता हास्य म्हणले की विडंबन कविता ओघाने आल्याच, यामध्ये रस्त्यात सापडलेले विडीचे थोटूक,काढ सखे गळ्यातले,लोकलची कविता,मिस्सळ मी चापतो, श्रावणमासी ही विडंबने अप्रतिम .

स्वतंत्र अनुभवावरील कवितेत जे मोकळेपण असते ते विडंबनांमध्ये नसते त्यामुळे एका चौकटीच्या आतच व्यक्त व्हावे लागते, वर ज्या कवितांचे शिर्षक दिले त्या कविता मला मनस्वी वाटल्या. या कवींनी आपली आपली काव्यसाधना अशीच चालू ठेवावी आणि अर्थातच यामध्ये ज्यांचा समावेश नाही त्या माझ्या इतर कविमित्रांनी या कविता मनापासून वाचाव्या म्हणजे आपली कविता व या रचना यामधले अंतर जाणवेल .

संगीतासारखी लेखनाच्या क्षेत्रात, सहित्याच्या क्षेत्रात गुरूपरंपरा नसते तो रस्ता आपण आपला शोधायचा असतो, आणि कुठल्याही श्रेष्ठ कवीच्या सर्व रचना अव्वल दर्जाच्या असतातच असे नाही .

नेटाक्षरीच्या सृजनशील उपक्रमाला आणि मायमराठीच्या या ऐतिहासिक अशा जागतिक उपक्रमाला माझ्या शुभेच्छा !!!

- अशोक नायगावकर ( परिक्षक व विशेष अतिथी )


तुमच्या सृजनशील अंकाला
आणि मायमराठीच्या या ऐतिहासिक अशा जागातील
उपक्रमाला माझ्या शुभेच्छा!

रसिकांना नेहमी उत्तमोत्तम आणि नवनवीन काव्य पुरविण्याचा ई साहित्य प्रकाशनाचा ध्यास नेटाक्षरी जोमाने पार पाडीत आहे.दर आठवड्यात मिळणाऱ्या तुमच्या प्रतिसादांनी आमचा उत्साह द्विगुणित होतोय.नेटाक्षरी हा साप्ताहिक अंक सध्या सुमारे ३५००० मराठी रसिकांना विनामूल्य वितरीत केला जातो.ह्याव्यतिरिक्त वेबसाईटवर व्हिजीट करुन वाचणाऱ्यांची संख्या लक्षणीय आहे.हा अंक आपण आपल्या मित्रपरिवारास फॉरवर्ड करण्यास आमची काहीही हरकत नाही.सोबतच,असे करतांना आमच्या आयडीचा अंर्तभाव केल्यास आम्ही आपले अत्यंत आभारी राहू. मराठी कवितेची लोकप्रियता वाढवण्यास आपला हातभार लागावा ही इच्छा.आपल्यासारख्या रसिकांच्या साह्याने हा अंक एक लक्ष वाचकांपर्यंत पोहचवण्याचा आमचा संकल्प सिध्दीस जाईल असा आम्हाला विश्वास आहे.

*हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी तसेच सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी..*
netaksharee@gmail.com